**रमाबाई आंबेडकर नगर, घाटकोपर येथील झोपड्यांमधील झोपडीधारकांचे पुनर्वसन करण्यासाठी MMRDA आणि SRA यांच्या संयुक्त भागीदारीत झोपडपट्टी पुनर्वसन योजना राबविण्यास मंजुरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.३१९/झोपसु-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ३१ जूलै, २०२४.

**संदर्भ**:- १) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग, क्र.संकिर्ण-२०२३/प्र.क्र.९३/झोपसु-१, दि.२१/०९/२०२३.
२) झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणाचा दि.२२/१२/२०२४ रोजीचा प्रस्ताव.
३) अपर मुख्य सचिव (गृहनिर्माण) यांच्या अध्यक्षतेखालील बैठक दि.११/०१/२०२४.

**प्रस्तावना:-**

मुंबई महानगर प्रदेशातील काही झोपडपट्टी पुनर्वसन योजना झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणामार्फत न राबविता अन्य महामंडळे / प्राधिकरणे / स्थानिक स्वराज्य संस्था आणि संबंधित झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण यांच्या संयुक्त भागिदारीत (JV) राबविण्यास संदर्भाधीन दि.२१/०९/२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. तसेच यानुषंगाने झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणास प्राप्त होणा-या प्रस्तावावर शिफारस करण्यासाठी अपर मुख्य सचिव (गृहनिर्माण) यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात आली आहे.

रमाबाई आंबेडकर नगर, घाटकोपर येथील झोपड्यांमधील झोपडीधारकांचे पुनर्वसन दिनांक २१/०९/२०२३ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार MMRDA आणि SRA यांच्या संयुक्त भागीदारीत करण्याचा प्रस्ताव झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणाने संदर्भाधीन दि.२२/१२/२०२३ रोजीच्या पत्रान्वये सादर केला आहे. सदर प्रस्ताव दिनांक २१/०९/२०२३ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार स्थापन झालेल्या समितीच्या दि.११/०१/२०२४ रोजी झालेल्या बैठकीमध्ये चर्चा होउन सदर प्रकल्प MMRDA आणि SRA यांच्या संयुक्त भागीदारीत करण्याचा शिफारस करण्यात आली आहे.

उपरोक्त वस्तुस्थितीच्या पार्श्वभूमीवर रमाबाई आंबेडकर नगर, घाटकोपर येथील झोपड्यांमधील झोपडीधारकांचे पुनर्वसन दिनांक २१/०९/२०२३ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार MMRDA आणि SRA यांच्या संयुक्त भागीदारीत राबविण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

१. रमाबाई आंबेडकर नगर, घाटकोपर (पूर्व) येथील न. भू. क्र. १९४ (भाग) व १९५ (भाग) या भू-भागावरील अंदाजित ३३१४९५.४४ चौ. मी. (३३.१५ हेक्टर) जमिनीवर व्यापलेल्या झोपडपट्टीमधील झोपडीधारकांचे पुनर्वसन दि.२१/०९/२०२३ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदींनुसार MMRDA आणि SRA यांच्या संयुक्त भागीदारी तत्वावर करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. योजना जलदगतीने पूर्ण करण्यासाठी आवश्यक कामांची विभागणी झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, मुंबई आणि मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण (MMRDA) यांचेमध्ये पुढीलप्रमाणे करण्यात यावे:-

**<u>अ) झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणाकडून करण्यात येणारी कामे:-</u>**

१) गृहनिर्माण विभागाच्या दि.२१/०९/२०२३ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदींनुसार रमाबाई आंबेडकर नगर, घाटकोपर येथील झोपडीधारकांच्या पुनर्वसनासाठी MMRDA आणि SRA यांच्या संयुक्त भागीदारीत योजना राबविण्यासाठी सादर करावयाच्या प्रस्तावाबाबत आवश्यक ती कार्यवाही करणे.

२) झोपड्यांचे सर्वेक्षण व पात्रतेसाठी आवश्यक Biometric सर्वेक्षण करणे.

३) कलम ३(C) अन्वये झोपडपट्टी व्याप्त क्षेत्र म्हणुन जाहीर करणे,

४) झोपडपट्टी अधिनियमातील कलम १४(१) अन्वये खाजगी जागा अधिग्रहीत करणे.

५) नियोजन प्राधिकरण म्हणून झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणाकडून प्रकल्पाची स्विकृती, आशयपत्र, नकाशे, बांधकाम परवानग्या, भोगवटा प्रमाणपत्र इत्यादी परवानग्या देणे.

६) एमएमआरडीए कडून प्राप्त भाडे झोपडीधारकांना अदा करुन प्रकल्पासाठी भूखंड मोकळा करुन एमएमआरडीए ला विकास करण्यासाठी देणे.

७) योजनेस सहकार्य न करणा-या झोपडीधारकांवर झोपडपट्टी अधिनियमातील कलम ३३, ३८ च्या तरतुदीनुसार कारवाई करणे.

**<u>ब) मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकडून करण्यात येणारी कामे:-</u>**

१) सदर प्रकल्पासाठी वास्तुविशारद व कंत्राटदार यांची नियुक्ती करणे.

२) सदर प्रकल्पाचा विस्तृत व्यवहार्यता अहवाल (Feasibility Report) व प्रकल्पातील इमारतींचा विस्तृत नियोजन प्रस्ताव बनविणे.

३) सदर प्रकल्पातील पात्र झोपडीधारकांना भाडे किंवा पर्यायी संक्रमण शिबीराची व्यवस्था करणे.

४) सदर प्रकल्पाचा प्रस्ताव झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणाकडे मान्यतेस्तव सादर करणे.

५) सदर प्रस्तावातील मान्यतेप्रमाणे प्रकल्पाच्या ठिकाणी बांधकाम करणे / पुनर्वसन इमारती बांधणे / पीएपी /विक्री घटक इत्यादींचे बांधकाम करणे.

३. सदरहू योजना गृहनिर्माण विभागाच्या संदर्भाधीन दि.२१/०९/२०२३ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदीस अनुसरुन राबविण्यात येईल. सदरहू योजनेस उक्त शासन निर्णयातील सर्व अटी व शर्ती लागू राहतील.

४. सदर योजना MMRDA आणि SRA यांच्या संयुक्त भागीदारीत राबविण्याबाबत आवश्यक अटी व शर्तीसह करारनामा झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणाने MMRDA सोबत करावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२४०७३११५१८४१८००९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNIL BABURAO TUMBARE

Digitally signed by SUNIL BABURAO TUMBARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOUSING DEPARTMENT, 2.5.4.20=6db48f86ab804a2f08a49a53d5dddd92f7dca38c78a21ad05da451e33813593c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=4E35B68528305D98FA8F8D62D295D490751E30D94B9E433CB0CC3714A0098215, cn=SUNIL BABURAO TUMBARE
Date: 2024.07.31 15:33:33 +05'30'

**( सु.बा.तुंबारे )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.

२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई- ३२.

३. मा.मंत्री (गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.

४. मा.मुख्य सचिव, यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२.

५. अपर मुख्य सचिव (गृहनिर्माण), गृहनिर्माण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२.

६. आयुक्त बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई.

७. महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई.

८. मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, प्रशासकीय इमारत, अनंत काणेकर मार्ग, वांद्रे (पूर्व) मुंबई-५१.

९. निवडनस्ती/ झोपसु-१.